**महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई या कार्यालयासाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात राबविण्यात येणाऱ्या विविध योजनाकरिता अनुदान वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : उसाअ-२०१६/प्र.क्र.४५ /उसाअ**
मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ३ डिसेंबर, २०१६

**वाचा -**

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. इयुए-१०७५/एल-जेजे, दि.१६/०४/१९७५.
२) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.उसाअ २०१६/प्र.क्र.६ (सुधा-१) का-४ दि.०५/१०/२०१६
३) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग,क्रं. बीयुडी-२०१५/प्रक्र.४३ (भाग१)/का.७, दि.२०/०४/२०१६.
४) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र. उसाअ-२०१६/प्र.क्र. ४५/ उसअ दि. ०२/१२/२०१६.

**प्रस्तावना -**

उपरोक्त संदर्भीय अ.क्र. (२) येथील दि.०५/१०/२०१६ च्या शासन निर्णयान्वये राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांचे पूनर्विलोकन करण्यात आले आहे. महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात राबविण्यात येणाऱ्या विविध प्रकल्प/कार्यक्रमांची अंमलबजावणी करण्याकरिता "मागणी क्र. झेडई- ०१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२, समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम ०१, अल्पसंख्यांकांना सहाय्य, अनुदान ०६ राज्य योजनेअंतर्गत योजना (०१) (२३) महाराष्ट्र राज्य, उर्दू साहित्य अकादमीचे विविध योजनेसाठी सहायक अनुदान राज्य योजनांअंतर्गत योजना (२२३५ बी ०९४) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली रु.१.०० कोटी इतकी तरतूद करण्यात आली असून उपरोक्त संदर्भ क्र.०३ अन्वये रु.८०.०० लाख (८०%) इतकी निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने सन २०१६-१७ करीता उपलब्ध अनुदान महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीसाठी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात राबविण्यात येणाऱ्या विविध प्रकल्प/कार्यक्रमाची अमंलबजावणी करण्याकरीता रु.१.०० कोटी (रुपये- एक कोटी फक्त) एवढे अनुदान अर्थसंकल्पित करण्यात आले आहे. संदर्भ क्र. (३) येथील परिपत्रकान्वये सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर असलेल्या रु.१.०० कोटी इतक्या अनुदानापैंकी ८०% प्रमाणे रु.८०.०० लाख अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त अ.क्र. (४) येथील आदेशान्वये बाबनिहाय खर्चासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार रु.८०.०० लाख (रुपये- ऐंशी लाख फक्त) एवढे योजनाअंतर्गत अनुदान महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीचा खर्च् मंजूर अनुदानाच्या विहीत मर्यादित राहील याची अधिक्षक नि कार्यकारी अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. तसेच मंजूर रक्कमेतून प्रलंबित देयके अदा करण्यास देखील मंजूरी देण्यात येत आहे. सदर देयकांची व्दिरुक्ती होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. तसेच शासनाने खर्चाबाबत विहित केलेल्या नियमानुसार, अटी व शर्तीचे पालन करुन कार्यवाही करावी.

३. सदर रक्कमेचा इसीएस (ECS) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नावाने काढण्यात यावा.

४. उपरोक्त खर्च "मागणी क्र. झेडई- ०१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२, समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम ०१, अल्पसंख्यांकांना सहाय्य, अनुदान ०६ राज्य योजनेअंतर्गत योजना (०१) (२३) महाराष्ट्र राज्य, उर्दू साहित्य अकादमीचे विविध योजनेसाठी सहायक अनुदान राज्य योजनांअंतर्गत योजना (२२३५ बी ०९४) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. अधिक्षक नि कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी यांनी सदर खर्चाचे तपशिल व निधीचे विनीयोगाचे प्रमाणपत्र विहित कालावधीत सादर करणे अनिवार्य राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०३१२२४५४७४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anees Iqbal Ismail Shaikh

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=447981acddcc5079f9c00eadfad2054d955a80a21de6164c4024daf5a9ea2c97, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2016.12.03 14:56:25 +05'30'

**(अनिस शेख)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ (ले.प/ले व अ.) मुंबई/ नागपूर, महाराष्ट्र राज्य,
२. अधिदान व लेखा अधिकारी मुंबई, (रोख कार्यासनामार्फत)
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
४. अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग (का-७),
५. अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, (रोखशाखा दोन प्रती)
६. कार्याध्यक्ष महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई (अकादमीच्या कार्यालयामार्फत)
७. कक्ष अधिकारी (का-७), अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (का-८), अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अधिक्षक-नि-कार्यकारीअधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.
१०. निवड नस्ती (का.८).